मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,
नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद,
सहाय्यक अनुदान २०२३-२०२४ (अनिवार्य)
( पहिला हप्ता )

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२३ /प्र.क्र.३२/२३/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. २७ एप्रिल, २०२३

वाचा:- **१.** शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/ अर्थसंकल्प ३, दि.१२ एप्रिल, २०२३.
**२.** शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र. अर्थसं २०२३ /प्र.क्र.२२/२५ दि.१७ एप्रिल, २०२३.
**३.** संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद, यांचे पत्र क्र.२०२३/मप्रविप्रप्र/आस्था/वेतनअनुदान/ कावि/२३५, दि. २१.०४.२०२३

**शासन निर्णय**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद ,या संस्थेला सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य अंतर्गत खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.१४.७० लाख व वेतने रु.११०.०० लाख अशी एकूण रु. १२४.७० लाख ( अक्षरी रुपये एकशे चोवीस लाख, सत्तर हजार फक्त ) इतकी तरतूद करण्यात आली आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अनिवार्य खर्चाच्या ३६ सहायक अनुदान (वेतने) करिता, अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार एप्रिल २०२३ ते डिसेंबर २०२३ अखेर नऊ महिन्याकरिता ७० % च्या मर्यादेनुसार एप्रिल ते जुन २०२३ या तीन महिन्याकरिता रु.२२.०० लाख (अक्षरी रुपये बावीस लाख फक्त) इतका निधी वेतन खर्च भागविण्यासाठी व ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) करिता अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार १० % च्या मर्यादेत रु.१.४७ लाख इतका निधी संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध झाला आहे. सदर अनिवार्य सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद या संस्थेला अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल ते जुन २०२३ या ३ महिन्यांकरिता संदर्भाधीन क्र.२ अन्वये २०% च्या मर्यादेत व संस्थेच्या मागणीनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले रु.२२,००,०००/- (रुपये बावीस लाख फक्त) इतके अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान (वेतने) ( पहिला हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे. तसेच संस्थेच्या कार्यालयीन खर्चासाठी १० % च्या मर्यादेत रु. १,४७,०००/- ( रुपये एक लाख,सत्तेचाळीस हजार फक्त) इतका निधी ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) करिता ( पहिला हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०७४६) याखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु. २२,००,०००/- ( रुपये बावीस लाख फक्त ) व ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर ) या खाली रु. १,४७,०००/- ( रुपये एक लाख, सत्तेचाळीस हजार फक्त ) याप्रमाणे भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व ३१ सहाय्यक नुदान (वेतनेतर )करिताचे उपयोगिता प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२३-२०२४ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

६. संस्थेने आता ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर )करिताचे वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. संस्थेने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.७ नमूद केल्यानुसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करतांना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट ( Bank Account Statement ) देयकासोबत जोडण्यात यावे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३ दि. १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील नमूद अटींची पूर्तता प्रस्तुत प्रस्तावात होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२७१५११०६३३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAUMUDI RAVINDRA MARGAJ

Digitally signed by KAUMUDI RAVINDRA MARGAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=86b41f0c8c4d9cee4d4b8d9e6a2f78b63ed85082bb42fbb618ff074d97dd8622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=367FC9F5DAA15F4A0F19196A388639367A57BDA9ED0C495EA0C57DA461234AB8, cn=KAUMUDI RAVINDRA MARGAJ
Date: 2023.04.27 15:17:43 +05'30'

**( कौमुदी मरगज )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, (उ.) पैठण, औरंगाबाद.
५) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
७) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि. औरंगाबाद.
८) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१०) मा. अ.मु. स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ).